आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी मर्यादित अनुदान या योजनेंतर्गत अहमदनगर,नाशिक, नंदुरबार,धुळे जिल्ह्यातील विविध वीज विषयक कामांकरिता रू.३०.६० कोटी (पुरवणी मागणी) निधी रोखीने वितरीत करणेबाबत.
(लेखाशिर्ष-२८०१ ५०८९)

महाराष्ट्र शासन
उद्योग, ऊर्जा ,कामगार व खनिकर्म विभाग
शासन निर्णय क्रमांक : पुरमा-२०२४ /प्र.क्र.८८/ऊर्जा-५
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २९ मार्च, २०२५

वाचा :-

१. उ,ऊ,का व ख.विभाग शा. नि. क्र: संकिर्ण-२०२३ / अनौप क्र.-२२ /ऊर्जा-५, दि. १०.०१.२०२४.
२. उ,ऊ,का व ख.विभाग शा. नि. क्र: संकिर्ण-२०२३ / अनौप क्र.-११/ऊर्जा-५, दि.२५.०१.२०२४ .
३. उ,ऊ,का व ख.विभाग शा. नि. क्र: संकिर्ण-२०२३ / प्र.क्र.०४/ऊर्जा-५, दि.१२.०३.२०२४ .
४. उ,ऊ,का व ख.विभाग शा. नि. क्र: संकिर्ण-२०२३ / प्र.क्र.४९०/ऊर्जा-५, दि.१३.०३.२०२४ .
५. वित्त विभाग, शा.नि.क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३,दि.२५/०७/२०२४
६. उ,ऊ,का व ख.विभाग शा. नि. क्र: संकिर्ण-२०२४ / प्र.क्र.९२/ऊर्जा-५, दि.१४.१०.२०२४ .
७. उ,ऊ,का व ख.विभाग शा. नि. क्र: पुरमा-२०२४ /प्र.क्र.८८/ऊर्जा-५, दि.२४.०९.२०२४.
८. उ,ऊ,का व ख.विभाग शा. नि. क्र: संकिर्ण-२०२४ / प्र.क्र.६४/ऊर्जा-५, दि.२६.११.२०२४ .
९. आदिवासी विकास विभाग शा. नि. क्र: बीयुडी-२०२४/प्र.क्र.०९ /कार्या-६, दि. ११.१२.२०२४.
१०. उ,ऊ,का व ख.विभाग शा. नि. क्र : पुरमा-२०२४ /प्र.क्र.८८/ऊर्जा-५, दि.१८.१२.२०२४.
११. आदिवासी विकास विभाग शा. नि. क्र: बीयुडी-२०२४/प्र.क्र.०९ /कार्या-६, दि. २८.०३.२०२५

**प्रस्तावना:-**

महावितरण कंपनीस विविध विद्युत विषयक कामांकरिता आदिवासी विकास विभागाच्या आदिवासी उपयोजनेअंतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता मूळ व पुरवणी अशी एकूण रु.७२.०० कोटी इतक्या निधीची सुधारित तरतुद करण्यात आली आहे.

२. सदर तरतुदीपैकी वित्त विभाग व आदिवासी विभागाच्या मान्यतेने संदर्भिय शा.नि.क्र.६, ७ व ९ अन्वये रु.४१.४० कोटी निधी महावितरण कंपनीस विविध विद्युत विषयक कामांकरिता रोखीने वितरित करण्यात आला आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.५ मधील शासन परिपत्रकातील सुचनांच्या अनुषंगाने व वित्त विभागाने अनुमती दिल्यानुसार आदिवासी विकास विभागाने आदिवासी उपयोजनेअंतर्गत जुलै, २०२४ च्या अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे तरतुद करण्यात आलेला रु.५०.०० कोटी रक्कमेपैकी रू. ३०.६० कोटी रक्कम महावितरण कंपनीस रोखीने वितरित करण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय :-**

महावितरण कंपनीस विविध विद्युत विषयक कामांकरिता आदिवासी विकास विभागाच्या आदिवासी उपयोजनेअंतर्गत जुलै, २०२४ च्या अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे तरतुद करण्यात आलेला रु.५०.०० कोटी रक्कमेपैकी उर्वरित रु.३०,६०,००,०००/- (रु. तीस कोटी साठ लक्ष फक्त) रक्कम प्रपत्र "अ" मधील विविध विद्युत कामाकरिता महावितरण कंपनीस रोखीने वितरीत करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. या निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या निधीची रक्कम प्रपत्र "अ" मधील विविध विद्युत कामाकरिताच खर्च होईल याची दक्षता महावितरण कंपनीने घ्यावी. ज्या उद्देशासाठी सदर निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच उद्देशासाठी तो उपयोगात आणला जाईल. तसेच मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत विहित वेळेत प्रकल्प पूर्ण करण्याची जबाबदारी महावितरण कंपनीची राहील.

३. वरील बाबींचा खर्च मागणी क्र.टी-५, २८०१, वीज उपमुख्य लेखाशिर्ष-८० सर्वसाधारण, गौणशिर्ष-७९६ जनजाती क्षेत्र योजना, गटशिर्ष-(०१) जनजाती क्षेत्र उपयोजना उप गट शिर्ष योजना (०१) (०३) महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनीस अनुदान योजना सांकेतांक (२८०१ ५०८९) (राज्यस्तरीय योजना) (कार्यक्रम) ३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ करिता मंजूर अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

४. सदरची रक्कम अधिदान व लेखा अधिकारी यांच्यामार्फत कोषागारातून काढून संचालक (वित्त) महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्रीमती अंकिता बोऱ्हाडे, कक्ष अधिकारी (ऊर्जा-३) व नियंत्रण अधिकारी म्हणून श्री.ना.श्री.कराड, सह सचिव (ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर मंजुर झालेली रक्कम रु.३०,६०,००,०००/- (रु.तीस कोटी साठ लक्ष फक्त) शासन निर्णय उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग क्र.संकीर्ण-२०२४/ प्र.क्र.९४/ऊर्जा-३, दि. १३.१२.२०२४ अन्वये आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक म्हणून घोषित करण्यात आलेले संचालक (वित्त), महावितरण कंपनी, मुंबई यांच्या नावे अदा करण्यात यावी .

५. सदर उपलब्ध करून दिलेल्या तरतुदीतुन झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेल्या भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

६. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

७. या लेखाशिर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. तसेच उपयोगिता प्रमाणपत्र प्रलंबित नाही. सदर देयक हे सशर्त असून वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/ अर्थ-३,दि.२५/०७/२०२४ व १२/०२/२०२५ रोजीच्या परिशिष्टातील तपासणी अटीची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय आदिवासी विकास विभागाने दि. २८.०३.२०२५ रोजी निर्गमित केलेल्या शासन निर्णय अन्वये मान्यता दिल्यानुसार निर्गमित करण्यात येत आहे. सदर शासन निर्णय, वित्त विभागाने ई-ऑफिस, Comp No.: ८५९०४८ नस्ती क्र. पुरमा-२०२४ /प्र.क्र.८८/ऊर्जा-५ वर दि.१९.०३.२०२५ रोजी दर्शविलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२५०३२९१६०४०१६२१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NARAYAN SHRIKRISHNA KARAD

Digitally signed by NARAYAN SHRIKRISHNA KARAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY LABOUR AND MINING DEPARTMENT, 2.5.4.20=fc35aa8ffade5bb6105200693c60a32b755f7e67f72965b8dd57adaa570981f1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AE7FAEABAF4571C2748E4DD5FFD2CD108DE0E130859970F4D7D0EE40046B3E9E, cn=NARAYAN SHRIKRISHNA KARAD
Date: 2025.03.29 16:05:34 +05'30'

**(ना. श्री. कराड)**
**शासनाचे सह सचिव**

**प्रत:-**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव,राजभवन,मलबार हिल,मुंबई.
२. मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष विधानसभा,सभापती/उपसभापती विधानपरिषद,यांचे सचिव.
३. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन), यांचे प्रधान सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
५. मा. मंत्री अपारंपारिक ऊर्जा,यांचे खाजगी सचिव मंत्रालय,मुंबई-३२.
६. मा. राज्यमंत्री ऊर्जा, यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
७. सर्व मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
८. मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई-३२.
९. सर्व विधानसभा/विधानसभा सदस्य.
१०. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
११. अपर मुख्य सचिव (वित्त) मंत्रालय, मुंबई-३२.
१२. अपर मुख्य सचिव (नियोजन ) मंत्रालय, मुंबई-३२.
१३. अपर मुख्य सचिव (ऊर्जा) मंत्रालय, मुंबई-३२
१४. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१५. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सुत्रधारी कंपनी, फोर्ट, मुंबई
१७. अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई.
१८. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, अहमदनगर, नाशिक, नंदुरबार, धुळे.
१९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर
२०. महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई
२१. कोषागार अधिकारी, अहमदनगर, नाशिक, नंदुरबार, धुळे.
२२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२३. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
२४. अवर सचिव, (अर्थसंकल्प/व्यय-१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२५. कार्यासन अधिकारी (ऊर्जा-३), उद्योग,ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२६. कार्यासन अधिकारी (का.६ व ३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२७. कार्यासन अधिकारी (रोख), उद्योग,ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२८. निवड नस्ती (ऊर्जा-५), उद्योग,ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२९. ऊर्जा विभागातील सर्व कार्यासने.

शासन निर्णय क्रमांक : क्र. पुरमा-२०२४ /प्र.क्र.८८/ऊर्जा-५ दि. २९.०३.२०२५ चे सहपत्र

विवरण पत्र "अ"

आदिवासी बहुल क्षेत्रात वीज विषयक कामांकरिता वितरीत करण्यात आलेल्या निधीचा तपशील

(रू. कोटी)

| अ. क्र. | कामांचे नाव | लेखाशिर्ष व बाब क्रमांक | प्र.मा.दिनांक | प्र.मा. किंमत | वितरीत निधी | सदर शा.नि.अन्वये वितरीत करण्यात येत असलेली रक्कम |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | अहमदनगर जिल्ह्यातील अकोले व संगमनेर तालुक्यातील आदिवासी भागातील वाडी / वस्त्यांचे पारंपारिक पध्दतीने विद्युतीकरण करणे. | **२८०१५०८९ बाब-३५** भांडवली मत्तेच्या निर्मिती करिता अनुदान | दि.१०.०१.२०२४ | ९.७६९ | ३.४१९२ | ६.३४९८ |
| २ | नाशिक जिल्ह्यातील कळवण-सुरगाणा मतदार संघातील कळवण तालुक्यातील आदिवासी भागातील विविध विद्युत विषयक कामे करणे. | | दि.२५.०१.२०२४ | ८.२४६८ | २.८८६३ | ५.३६०५ |
| ३ | नाशिक जिल्ह्यातील दिंडोरी -पेठ मतदार संघातील आदिवासी भागातील विविध विद्युत विषयक कामे करणे. | | दि.१२.०३.२०२४ | ७४.९२ | १४.९८४ | ९.७७६५ |
| ४ | नंदुरबार जिल्ह्यातील अक्कलकुवा तालुक्यातील गमन येथे ३३/११ के.व्ही. क्षमतेचे नविन उपकेंद्र उभारणे. | | दि.१३.०३.२०२४ | ८.३८४३ | १.६७६८ | ६.७०७५ |
| ५ | धुळे तालुक्यातील साक्री तालुक्यातील ३३/११ के.व्ही. बल्हाणे उपकेंद्र ते मानव केंद्र, पिंपळनेर यामध्ये नवीन लिंक वाहीनी उभारणे. | | दि.१४.१०.२०२४ | २.४१ | ०.०० | २.४१ |
| | **एकूण :-** | | | **१०३.७३०१** | **२२.९६६३** | **३०.६०** |